आकस्मिकता निधीतून मंजूर केलेल्या रकमेपैकी उर्वरीत रक्कम प्रकल्प संचालक, हवामान अनुकूल कृषी प्रकल्प, यांच्याकडे हस्तांतरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राकृवि ०६१६/प्र.क्र.७९ /राकृवियो कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०४२
तारीख: ०२ डिसेंबर, २०१६

**वाचा :**

१. कृषी व पदुम विभाग, मंत्रालय शासन निर्णय क्र. हअप्र-०७१६/प्र.क्र.७९/राकृवियो कक्ष, दि. २४/०८/२०१६
२. कृषी व पदुम विभाग, मंत्रालय शासन निर्णय क्र. हअप्र-०७१६/प्र.क्र.८२/राकृवियो कक्ष, दि. १६/०९/२०१६
३. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई कार्यालयाचे पत्र क्र.अले/नियंत्रण/आयआय/फा-२३४(१३)/जा.क्र.२२८(ब), दि.०५.११.२०१६

**शासन निर्णयः**

जागतिक बँक सहाय्यीत हवामान अनुकूल कृषी प्रकल्प, मुंबई करीता संदर्भाधिन दि.२४.०८.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.१.५० कोटी आकस्मिकता निधी मंजूर करण्यात आला होता. त्यानुषंगाने संदर्भाधिन दि.१६.०९.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये हवामान अनुकूल कृषी विकास प्रकल्पासाठी (PoCRA) नियंत्रण अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी यांची नेमणूक करण्यात आली होती. सदरची पदे यापूर्वी BDS प्रणालीवर समाविष्ट नसल्याने प्रकल्पासाठी दि.२४.०८.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये आकस्मिकता निधीतून मंजूर केलेल्या रु.१.५० कोटी निधीचे वितरण उप सचिव (प्रशा), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई (नियंत्रक अधिकारी) यांच्यामार्फत प्रकल्पासाठी करण्यात येत होते.

२. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांच्या दि.०५.११.२०१६ रोजीच्या संदर्भाधिन पत्रान्वये प्रकल्पासाठी नियंत्रण अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी यांचा अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीमध्ये (BEMS) प्रणालीत समावेश करण्यात आला आहे. सबब, सदर प्रकल्पाकरीता वितरीत केलेल्या रु.१,५०,००,०००/- निधीपैकी खर्ची पडलेली रक्कम रु.६,१२,३४०/- वजा जाता उर्वरीत निधी रु. १,४३,८७,६६०/- (अक्षरी एक कोटी त्रेचाळीस लाख सत्याऐंशी हजार सहाशे साठ फक्त) प्रकल्प संचालक, हवामान अनुकूल कृषी प्रकल्प, मुंबई यांना हस्तांतरीत करण्याची कार्यवाही उप सचिव (प्रशा), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी करावी.

३. संदर्भाधिन शासन निर्णय दि. २४.०८.२०१६ अन्वये मंजूर केलेल्या प्रयोजनासाठी प्रकल्प संचालकांनी या शासन निर्णयान्वये हस्तांतरीत करण्यात येणारी रक्कम विनियोगात आणावी. सदर रक्कम कोषागारातून आहरीत करण्यासाठी प्रकल्प संचालक, हवामान अनुकूल कृषी प्रकल्प, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व वित्त तज्ज्ञ, हवामान अनुकूल कृषी प्रकल्प, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०२१५४६००४३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2016.12.02 15:49:22 +05'30'

**(श्रीकांत चं. आंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, पुणे,
५. प्रकल्प संचालक,हवामान अनुकूल कृषी प्रकल्प,मुंबई
६. उप सचिव (प्रशा),कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
७. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
१०.वित्त विभाग (व्यय १ / विसु १), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
११.नियोजन विभाग ( कार्यासन १४३१), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
१२. कक्ष अधिकारी, कार्यासन क्रमांक - २अे कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१३. निवड नस्ती